जिल्हा परिषद,पंचायत समिती, ग्रामपंचायती
व जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेव्दारे पंजीकृत
बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थाना/
लोकसेवा केंद्रांना द्यावयाच्या विविध सवलती

**महाराष्ट्र शासन,**
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : झेडपीए २००२/प्र.क्र.२०८/३३,(वित्त-९)
मंत्रालय,मुंबई-३२, दिनांक : २० डिसेंबर,२००२.

**वाचा :-**शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग,क्रमांक रोस्वरो-२००२/प्र.क्र.२६७/
रोस्वरो-१, दिनांक १७ ऑगस्ट,२००२.

**प्रस्तावना :-**

शासनाने ऑक्टोबर,२००० मध्ये रोजगार व स्वयंरोजगार कार्यक्रमाविषयी सर्व समावेशक व सर्वस्पर्शी धोरण आखलेले आहे. वाढते आधुनिकीकरण आणि यांत्रिकीकरण तसेच संगणकीकरण यामुळे पारंपारिक/औपचारीक स्वरुपाच्या नोक-या/रोजगार कमी प्रमाणात उपलब्ध होत असल्यामुळे शासनाने पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना व लोकसेवा केंद्रांना विविध सवलती देण्याचे व त्यांना आर्थिकदृष्ट्या बळकट करण्याचे धोरण आखलेले आहे. या धोरणाच्या अंमलबजावणीसाठी शासनाने सर्व विभागाच्या सहमतीने वर उल्लेखिलेला शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. या शासन निर्णयानुसार जिल्हा परिषद,पंचायत समिती, ग्रामपंचायती व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या संदर्भात उक्त संस्थांना कोणत्या सवलती देता येतील याचा विचार शासन स्तरावर सुरु होता. त्यानुषंगाने आता खालील प्रमाणे निर्णय घेण्यांत येत आहे.

**शासन निर्णय :-**

पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था व लोकसेवा केंद्रांव्दारे जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्रामपंचायती व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाच्या कार्यालयांसाठी उपलब्ध करुन द्यावयाच्या सेवा व मालाचा/वस्तूंचा पुरवठा, कामे देण्याच्या संदर्भात व अन्य बाबतीत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यांत यावी :-

**दैनंदिन कामाच्या सेवा बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था/लोकसेवा केंद्रांना हस्तांतरीत करण्याबाबत :-**

१) जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत कार्यालयाव्दारे विविध प्रकारची कामे घेण्यांत येतात. साधारणतः ही कामे कंत्राटी पध्दतीने राबविण्यांत येतात. यातील काही कामे हस्तांतरीत करण्यास वाव आहे. अशा पध्दतीची दैनंदिन व्यवहाराची कामे व विविध प्रकारच्या सेवा या स्वयंसहाय्यता गट, पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था व

लोकसेवा केंद्र यामध्ये काम करणा-या व्यक्तींच्या कुवतीनुसार देता येतील. अशा कामांची यादी उदाहरणादाखल खाली नमूद केल्याप्रमाणे आहे.

(१) कुरीअर सर्विस, (२)पाणीपट्टी/भाडेपट्टी वसूल करणे, (३) गावातील रस्त्यांवर दिवे लावणे व बंद करणे, (४) कार्यालयीन कामकाज (रेकॉर्ड लावणे,रेकॉर्ड उपलब्ध करुन देणे,साफसफाई राखणे,खिडक्यांच्या काचा व उपकरणे साफ करणे व अन्य),(५) प्लंबिंगची कामे,(६) विजेची कामे, (७) सुतारकाम, (८) वेतकाम, (९) विविध योजनेसाठी बेरोजगार उपलब्ध करुन देणे (शिलाईची व तशाच प्रकारची अन्य कामे), (१०) मदतनीसाची कामे, (११) रखवालदाराची कामे, (१२) वॉर्निश पेंटींग इत्यादी कामे,(१३) पेस्ट कंट्रोलची कामे, (१४) छप्पर दुरुस्ती व बांधकाम दुरुस्तीची किरकोळ कामे, (१५) अल्पोपहार सेवा, (१६)हस्तलिखित नक्कल खतावणे.

वरील कामाव्यतिरिक्त अन्य प्रकारची कोणती कामे देता येतील याची यादी वरील सर्व कार्यालयांनी तयार करावी व ही कामे संबंधित स्वयंसहाय्यता गट, पंजीकृत संस्थेतील/ केंद्रातील बेरोजगार युवक / युवतींव्दारे व पंजीकृत बेरोजगार मजूर सहकारी संस्था कडून त्यांच्या क्षमतेनुसार करुन घेण्यांत यावी. असे करतांना सेवेचा दर्जा उत्कृष्ट राहिल याची काळजी घेण्यांत यावी. तसेच सद्य:स्थितीत त्या सेवेवर होणा-या खर्चापेक्षा जास्त खर्च होणार नाही याचीही दक्षता घेण्यांत यावी.

**प्रशिक्षण कार्यक्रमाच्या योजनेशी सांगड घालणे :-**

२) केंद्र व राज्य शासनाच्या ब-याच योजना या प्रशिक्षणाभिमुख योजना आहेत. लाभार्थ्यांना योजनेचे पूर्ण ज्ञान व्हावे व योजनेत लाभार्थ्यांना उपलब्ध करून देण्यात आलेला लाभ पूर्णत: प्राप्त व्हावा याकारणासाठी प्रशिक्षण देण्यात येते. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत राबविण्यात येणा-या योजना जसे स्वर्ण जयंती ग्रामीण स्वरोजगार योजना, ट्रायसेम, बायोगॅस, सुधारीत चुली व इतर योजना तसेच राज्य शासना व्दारे राबविण्यात येणा-या योजना याबाबत जिल्हा गामीण विकास यंत्रणा व जिल्हा परिषदांनी संबंधित स्वयंसहाय्यता गट, पंजीकृत संस्थेतील/ केंद्रातील बेरोजगार युवक / युवतीं व पंजीकृत बेरोजगार मजूर सहकारी संस्थातील सदस्यांना त्यांचे क्षमतेनुसार व आवश्यकतेनुसार प्रशिक्षणाची सोय उपलब्ध करुन द्यावी.

औद्योगिक प्रशिक्षण संस्था या उच्च व तंत्र शिक्षण विभागाअंतर्गत कार्यरत असून त्यांच्या व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या समन्वयामधून जिल्हा परिषदेने ऑक्टोबर २००२ पासून १०० आयटीआय मध्ये वेगवेगळया विषयांवर शॉर्ट टर्म प्रशिक्षण सत्रे सुरु करावयाची आहेत. सदर सत्रात मूळ प्रशिक्षणा व्यतिरिक्त "मार्केटिंग बॅकवर्ड, फॉरवर्ड लिंकेज" प्रकल्प तयार करणे व बँकेला सादर करणे याचाही समावेश असेल.

## स्थापीत स्थावर मत्तेचा वापर :-

३) सहकारी संस्था अधिनियमाखाली आतापर्यंत सुमारे २८०० च्या वर बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था राज्यात स्थापन झालेल्या आहेत. याबाबत माहिती जिल्हयातील जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी यांचेकडून प्राप्त होऊ शकते या सहकारी सेवा संस्थाना मदत करण्याच्या दृष्टिकोनातून त्यांच्या व्यवसायास योग्य जागा माफक दराने मिळावी हे शासनाचे धोरण आहे. जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्राम पंचायत व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा आदि संस्थानी त्यांच्या मालकीच्या स्थावरमत्तेचा/ जमिनीचा आढावा घेऊन दिवसाच्या कामाच्या कालावधीत ज्यावेळेत या जागांचा पुर्णतः उपयोग होत नाही त्या कालावधीसाठी या जागा लोकसेवा केंद्र किंवा सेवा सहकारी संस्थाना अल्प भाडेतत्वावर उपलब्ध करून द्याव्यात. सदर प्रस्ताव गुणवत्तेनुसार तपासून प्रस्तावास शासनाची पूर्वमंजुरी घेण्यांत यावी. त्याचप्रमाणे भविष्यात निर्माण होणा-या स्थावर मत्ता व जागा यात उपरोक्त सहकारी संस्थाना योग्य वाटा मिळेल या दृष्टिकोनातून नियोजन करावे.

## कार्यालयीन साफसफाई स्वच्छतेची कामे करण्याबाबत :-

४) जिल्हा परिषद,पंचायत समिती व ग्रामपंचायतींमध्ये साफसफाई व स्वच्छतेची कामे नियुक्त कर्मचा-यांमार्फत करण्यांत येत आहेत. नियुक्त कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर रिक्त होणारी पदे यापुढे भरण्यांत येऊ नयेत. अशा प्रकारची कामे स्वयंसहाय्यता गट, बेरोजगारांच्या सेवा संस्थांना किंवा लोकसेवा केंद्रांना देण्यांत यावी. सदर संस्थांना अशी कामे देतांना या कामावर सद्यःस्थितील होणा-या खर्चापेक्षा जास्त खर्च होणार नाही व कामात उत्कृष्ट दर्जा राखण्यांत येईल याबाबत काटेकोरपणे देखरेख करण्यांत यावी.

## जिल्हा परिषद,पंचायत समिती व ग्रामपंचायत यांच्या कार्यालयांना लागणा-या विविध वस्तू व मालाचे आरक्षण :-

५) कार्यालयीन कामासाठी जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्रामपंचायती व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेची कार्यालये विविध प्रकारच्या वस्तू खरेदी करीत असतात. या वस्तुंचे वर्गीकरण करुन ज्या वस्तुंच्या अथवा मालाच्या निर्माणासाठी फारशा प्रगत/उच्च प्रकारच्या तंत्रज्ञानाची गरज नाही अशा मालाची किंवा वस्तुंची यादी तयार करण्यांत यावी. खरेदीबाबत दरकरार इत्यादी सोडून कामगार,उद्योग व उर्जा विभागाच्या दिनांक २/१/१९९२ च्या शासन निर्णयानुसार निविदा मागविणे आवश्यक असल्यास बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांकडून किमान २५% तसेच सर्व बचत गटामार्फत २५% याप्रमाणे वस्तुंची खरेदी करण्यांत यावी. बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थामध्ये परस्परात स्पर्धा होऊन त्याचप्रमाणे बचत गटामध्येही परस्परात स्पर्धा होऊन कमी किमतीत उत्कृष्ट दर्जाच्या वस्तू प्राप्त होतील यासाठी प्रयत्न करण्यात यावा. सदर खरेदी करतांना स्थानिक बाजारपेठेमध्ये त्या वस्तू ज्या किंमतीत उपलब्ध

आहेत त्यापेक्षा कमी किंमतीत त्या उपलब्ध होतील व त्याचा दर्जा उत्कृष्ट राहील हे पहाणे गरजेचे आहे. यासाठी अशा कार्यालयीन वस्तुंचे दर निश्चित करण्यांत यावेत.

**<u>पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना अनामत रक्कम भरण्यातून सूट देण्याबाबत :-</u>**

६) जिल्हा परिषद,पंचायत समित्या व ग्रामपंचायतीच्या कार्यालयांना लागणा-या विविध प्रकारच्या वस्तूंच्या खरेदीसाठी तसेच सेवेच्या पुरवठ्यासाठी भरण्यांत येणा-या वस्तुसाठी/मालाच्या खरेदीसाठी/ सेवेच्या पुरवठ्याकरिता निविदा भरतांना अनामत रक्कम भरण्याच्या अटीतून पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था व लोक सेवा केंद्रांना सूट देण्यांत यावी.

**<u>स्थावर मत्तेची देखभाल डागडुजी व दुरुस्ती करणेबाबत :-</u>**

७) संदर्भाधीन शासन निर्णयान्वये पंजीकृत बेरोजगार अभियंत्यांच्या सहकारी सेवा संस्थेस किंवा लोकसेवा केंद्रामार्फत स्थावर मत्तेची देखभाल डागडुजी व दुरुस्ती इत्यादी कामे रु.५ लक्षाच्या मर्यादेत देण्यांत यावीत असे नमूद केलेले आहे. या विभागाने ग्रामपंचायतीना रु.५ लक्षापर्यंतची व मजूर सहकारी संस्थां यांना रु.५ लक्ष (वर्षभरातील एकूण कामाची महत्तम किंमत रु.३० लक्ष) इतक्या मर्यादेपर्यंत विनानिविदा कामे देण्याबाबत शासन निर्णय यापूर्वीच निर्गमित केलेला आहे. यामुळे ग्रामपंचायत, मजूर सहकारी संस्था, पंजीकृत बेरोजगार अभियंत्यांच्या सेवा सहकारी संस्था किंवा लोकसेवा केंद्रा मार्फत आता रु.५ लाखापर्यंतची कामे विनानिविदा करता येतील. मात्र उक्त संस्थांपैकी जी संस्था कमी किंमतीत सदरहू काम करतील व उत्कृष्ट दर्जाची हमी देतील अशाच संस्थेला अशी कामे देण्यांत यावी.

**<u>लोकसेवा केंद्रे :-</u>**

८) जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्राम पंचायत व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी नागरी व ग्रामीण भागात आवश्यक असलेल्या विविध सेवा उपलब्ध करण्यासाठी बेरोजगारांना संघटित करुन त्यांना लोकसेवा केंद्रे स्थापन करण्यास प्रोत्साहन दयावे. आवश्यकतेनुसार प्रशिक्षण दयावे. हया प्रशिक्षणाची व्यवस्था स्वतःच्या जागेत किंवा स्वयंसेवी संस्थांमार्फत करावी. लोकसेवा केंद्र स्थापन करतांना शासकीय किंवा निमशासकीय जागा या ठिकाणी उपलब्ध करुन देता येईल. ब-याच जिल्ह्यांमध्ये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या माध्यमातून ग्रामसचिवालय बांधण्यांत आलेली आहेत. अशा ठिकाणी जागा उपलब्ध असल्यास लोकसेवा केंद्रांना ती उपलब्ध करुन देता येणे शक्य आहे. आवश्यकता वाटल्यास यासाठी येणारा खर्च हा स्वर्णजयंती ग्राम स्वयंरोजगार योजनांतर्गत मूलभूत सुविधेतून करणे शक्य होईल. या केद्रांना अल्प भाडयाने जागा देणे व दूरध्वनी उपलब्ध करुन देणे ही जबाबदारी

संस्थांची राहील. लोकसेवा केंद्राची पाटी दर्शनी भागात लावावी. नाव लिहिताना ठराविक चौकट व निश्चित केलेला रंग वापरण्यात यावा. या केंद्रात खालील बाबींची व्यवस्था करण्यात यावी.

अ) १५ X १५ फुट चे बांधकाम असलेली जागा व त्यामध्ये बेरोजगारास बसण्याची सोय असावी.

ब) लोकसेवा केंद्रासाठी लागणारे फर्निचर व दूरध्वनी मोफत पुरवावयाचा असून अनावर्ती खर्च संबंधित संस्थेने योजनेंतर्गत निधीतून करावा. आवर्ती खर्च जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्राम पंचायत व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांना शक्य असल्यास करावा किंवा संस्थेने अथवा केंद्रचालकाने करावा.

क) सेवाकेंद्रामार्फत दिल्या जाणा-या सेवेचे दर वाजवी व व्यवहारिक असावे.

ड) या केंद्रात काम करणा-या व्यक्तींचे नांव नोंदवून त्यांना ओळखपत्र देणे ही जबाबदारी जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्राम पंचायत व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांची राहील. शक्य असल्यास केंद्राच्या प्रांगणात सेवेस आवश्यक असणा-या सुटया भागाचे दुकान योजनेंतर्गत उघडण्यात यावे.

इ) वरील बाबीसाठी आवश्यक असणारा खर्च योजनांतर्गत निधीतून भागविण्यात यावा.

ई) अपंगांना प्राधान्य दिले पाहिजे.

फ) लोकसेवा केंद्रांची योग्य जाहिरात होईल याची व्यवस्था करावी.

या निर्णयाचे काटेकोरपणे पालन व्हावे.

200908051758 48001

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(एस. शहजाद हुसैन)
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२ नागपूर,
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई,
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२ नागपूर,

सर्व मंत्रालयीन विभागाचे अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व अध्यक्ष जिल्हा परिषद
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, सामान्य जिल्हा परिषद,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, ग्रामपंचायत जिल्हा परिषद,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, बालकल्याण जिल्हा परिषद,
सर्व कृषि अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती,
सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद,
सर्व कार्यकारी अभियंता, बांधकाम, जिल्हा परिषद,
सर्व कार्यकारी अभियंता, पाटबंधारे, जिल्हा परिषद,
सर्व शिक्षण अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
आयुक्त,रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय,
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी
सहकार आयुक्त, निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,मुणे
सहनिबंधक मुंबई,पुणे,नागपूर,औरंगाबाद,नाशिक व अमरावती
अधिक्षक अभियंता,मजूर सहकारी संस्था द्वारा आयुक्त व निबंधक संस्था,पुणे
सर्व जिल्हयांचे उप निबंधक, सहकारी संस्था,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे,कोकण,नागपूर,औरंगाबाद,अमरावती,
सर्व सहसचिव/उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
निवड नस्ती का.क्र.वित्त-९(३३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.